आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे कार्यालयासाठी डिजीटल पोस्टल फ्रँकिंग मशिन खरेदीस मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय :एसटीसी-२०११/प्र.क्र.४०६/का-१०,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ०८ डिसेंबर, २०११.**

**वाचा :-** आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे पत्र क्र. आस्था-२०११/प्र.क्र.४९/७२१, दिनांक ११.११. २०११.

**शासन निर्णय :-** आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे कार्यालयासाठी मे.किलबर्न ऑफिस ॲटोमेशन लि. कंपनी चे भारत सरकारच्या दरकरारावरील डिजीटल पोस्टल फ्रँकिंग मशिन Model Pitney Bowes DM १४०i खरेदीकरीता रुपये १,१४,९८०/- (रुपये एक लाख चौदा हजार नऊशे ऐंशी फक्त ) खर्च करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

(अ) सदरहू डिजीटल पोस्टल फ्रँकिंग मशिन खरेदीची प्रक्रिया विहीत कार्यपध्दती अनुसरुन करण्यात यावी तसेच प्रचलित असलेल्या नियमातील तरतूदी व इतर निर्देश यांचे अनुपालन करण्यात यावे.
(ब) खरेदीकरीता आवश्यक निधी उपलब्ध असला पाहिजे. त्याकरीता अधिक वेगळा निधी मंजूर करण्यात येणार नाही.
(क) डिजीटल पोस्टल फ्रँकिंग मशिन सुस्थितीत ठेवण्यासाठी आवश्यक तो सेवासंविदा करार विहीत पध्दतीने करण्यात यावा.

२. यावरील खर्च मागणी क्रमांक:टी-५, "२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) अनुसूचित क्षेत्राबाहेरील उपयोजना (०२)अनुसूचित जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना (०२)(२४)अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती (२२२५-४१२२)(२१) सामग्री व पुरवठा" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५-५-२००९ मधील भाग पहिला, उपविभाग चार मधील अ.क्र.१२ खालील तरतुदी नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१११२०८०९२३४९००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,**

**( सु. अ. हजारी )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**
मा. मंत्री (आदिवासी विकास)यांचे खाजगी सचिव.
मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास)यांचे खाजगी सचिव.
मा. प्रधान सचिव (आ.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.

महालेखापाल(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
वित्त विभाग, विनियम /अर्थसंकल्प-१४, मंत्रालय, मुंबई-३२.
कक्ष अधिकारी (का-०६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का-१०) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*******